**राज्यक्षेत्रातील योजना**

**बोथली प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, ता. सावली, जि. चंद्रपूर या योजनेच्या अंदाजपत्रकास व आराखडयास सुधारित प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**शासन निर्णय क्र. ग्रापापु-२००९/प्र.क्र. ३ (५)/ पापु-१३**
**दिनांक: १० फेब्रुवारी, २०१०**

**संदर्भ: १) शा. नि. पा. पु. व स्व. वि. क्र.ववेका-१०९८/प्र.क्र.४४५(अ)/पापु-१०, दि.१/६/१९९८**
**२) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नागपूर यांचे पत्र क्र. मजीप्रामंना/तांशा-३/३३८२/०९, दि.५/११/२००९**

**प्रस्तावना- बोथली प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, ता. सावली, जि. चंद्रपूर या योजनेच्या रुपये ३०९.२६** लक्ष खर्चाच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्र.१ शासन निर्णया अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापी काही अपिहार्य कारणास्तव योजनेच्या खर्चात वाढ झाली. त्यामुळे अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, चंद्रपूर यांचेकडून प्राप्त झालेल्या **बोथली प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, ता. सावली, जि. चंद्रपूर या योजनेच्या रुपये ३५३.५६** लक्ष किंमतीच्या सुधारित आराखडयास व अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णयः-** वरील प्रस्तावनेस अनुसरुन **बोथली प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, ता. सावली, जि. चंद्रपूर** या पाणी पुरवठा योजनेच्या **रुपये ३५३.५६ लक्ष (रु.तीनशे त्रेपन्न लक्ष छपन्न हजार फक्त)** ढोबळ किंमतीच्या सुधारित अंदाजपत्रकास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात येत, असुन त्या करिता करावयाच्या तरतुदीचा तपशील या शासन निर्णयाच्या सहपत्रात दर्शविण्यात आला आहे.

२. ही योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत कार्यान्वित करण्यात येईल.

३. या योजनेस मूळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या शासन निर्णयात ज्या सूचना, अटी व शर्ती दिल्या आहेत, त्याचे पालन करण्यात यावे.

४. ही योजना पूर्ण झाल्यावर जिल्हा परिषद, चंद्रपूर यांच्या ताब्यात देण्यात येईल. संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, चंद्रपूर यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास जिल्हा परिषद, चंद्रपूर जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद आणि महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या अधिका-यांनी संयुक्तपणे पहाणी आयोजित करावी आणि अशा पहाणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

५. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी पाणी पट्टीचे दर वाढविण्याची अट राहिल. योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नवीन करण्यासाठी जिल्हा परिषदेला शासनाकडून कोणतेही अनुदान मिळणार नाही. महाराष्ट्र ग्रामपंचायत

कर फी नियम, १९६० मधील तरतूदींनुसार आकारण्यात येणा-या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल असे बघण्याची जबाबदारी संबधित जिल्हा परिषदेची राहील.

६. या योजनेवर होणारा खर्च मागणी क्र. **"वाय-२,२२१५-पाणी पुरवठा व स्वच्छता ०१-पाणी पुरवठा- १०२-ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम-जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने-(०२) (०१) (डब्युएस-६) (राज्यक्षेत्र)** " पाणी पुरवठा योजनांसाठी ग्रामपंचायती/जिल्हा परिषद यांना अनुदाने (२२१५ १२१७) ४१ सहायक अनुदाने" या अर्थसंकल्पीय शिर्षाच्या खाती खर्ची टाकावा व त्याखाली उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागवावा.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.२१/७/२००१ च्या शासन निर्णयातील भाग पहिला उपविभाग तीन अनुक्रमांक ६ नियम क्र.२७ (अ) अन्वये प्रशासकीय विभागाना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००२१०१४४७२२००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**sd/-**

**(उ. ना. भोसले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,
१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१
३. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण , नागपूर विभाग, नागपुर.
**४.** मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर**.**
**५.** सदस्य सचिव, (छोटागट) तथा अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, चंद्रपूर**.**
६. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा,महाराष्ट्र शासन,पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट,पुणे.
७. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नागपूर.
८. वरिष्ठ भुवैज्ञानिक भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नागपूर.
९. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१,/२ मुंबई./नागपूर.
१०. महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई..
११. महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र २, नागपूर.
**१२.** कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, चंद्रपूर **.**
**१३.** कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, चंद्रपूर **.**
१४.मु.अ. तथा वि.का.अ., पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
१६. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
१७.सर्व कार्यासने, पा. पु. व स्व. वि., मंत्रालय, मुंबई-३२.
१८. निवडनस्ती कार्यासन पापु-१३.

**सहपत्र**

**शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. ग्रापापु-२००९/प्र.क्र. ३ (५)/पापु-१३, दिनांक: १० फेब्रुवारी, २०१० सोबतचे प्रपत्र**

**(रुपये लाखात)**

| योजनेचे नांव | योजनेची मुळ मंजुर किंमत | | | योजनेची सुधारित किंमत | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वर्धित वेग कार्यक्रमांतर्गत मंजुर तरतुद | किमान गरजा कार्यक्रमांतर्गत मंजुर तरतुद | एकुण | वर्धित वेग कार्यक्रमांतर्गत मंजुर तरतुद | किमान गरजा कार्यक्रमांतर्गत मंजुर तरतुद | एकुण |
| बोथली प्रादेशिक पाणी पुरवठा योजना ता. सावली जि.चंद्रपूर | २५३.४६ | ५५.८० | ३०९.२६ | २५३.४६ | १००.१० | ३५३.५६ |

Sd/-

**( उ. ना. भोसले)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**